सांगली मिरज आणि कुपवाड शहर महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील १० संवर्गातील अधिका-यांना शासनाच्या मान्यतेशिवाय सुधारीत वेतनश्रेण्या मंजूरीचा महासभा ठराव क्र. १२ दि. १९.०४.२००६ व आदेश विखंडीत करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

नगर विकास विभाग

**शासन निर्णय** क्र.सामपा- ३००५/३७५७/प्र.क्र.१७५ /नवि-२२

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

दिनांक : १४ जून, २०१०

वाचा :- १) आयुक्त, सांगली मिरज आणि कुपवाड शहर महानगरपालिका यांचे पत्र क्र.मनपा/प्रशावि/०१/१७४/०६-०७ दिनांक ८.९.२००६

२) आयुक्त, सांगली मिरज आणि कुपवाड शहर महानगरपालिका यांचे पत्र क्र.आस्थावि/२/४९/०६-०७ दि. १२.१.२००७.

३) आयुक्त, सांगली मिरज आणि कुपवाड शहर महानगरपालिका यांचे पत्र क्र.आस्थावि/२/४८८/०६-०७ दि. १७.३.२००७

४) समक्रमांक दि. १५ नोव्हेंबर, २००७ रोजीचा शासन निर्णय

५) आयुक्त, सांगली मिरज आणि कुपवाड शहर महानगरपालिका यांचे पत्र क्र.मनपा /आस्थावि/०२/९५/२००७-०८ दि. २८.११.२००७

६) आयुक्त, सांगली मिरज आणि कुपवाड शहर महानगरपालिका यांचे पत्र क्र.मनपा /आस्थावि/०१/१५३/२००७-०८ दि. २४.०१.२००८

७) आयुक्त, सांगली मिरज आणि कुपवाड शहर महानगरपालिका यांचे पत्र क्र.मनपा /आस्थावि/०१/२००/२००८-०९ दि. ८.०७.२००८

८) याचिका क्र. १४५०/२०१० मधील मा. उच्च न्यायालयाचे दि १९ मार्च, २०१० रोजीचे आदेश.

**प्रस्तावना:-**

सांगली मिरज आणि कुपवाड शहर महानगरपालिकेने महासभा ठराव क्र. १२ दि. १९.४.२००६ पारीत करुन त्या अनुषंगाने तत्कालीन आयुक्त, सांगली मिरज आणि कुपवाड शहर महानगरपालिका सांगली यांनी शासनाच्या वित्त विभागाचा दि. ९.१०.१९६६ चा शासन निर्णय, पाटबंधारे विभागाचा दि. १४.१२.१९९५ चा शासन निर्णय आणि सार्वजनिक बांधकाम विभागाचा दि ६.११.१९९६ रोजीचा शासन निर्णय विचारात घेवून महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील विविध ६ संवर्गासाठी रु. ६५००-१०५०० ऐवजी ८०००-१३५०० आणि १ संवर्गासाठी रु. ५०००-८००० ऐवजी ६५००-१०५०० आणि ३ संवर्गासाठी रु. ३२००-४९०० ऐवजी रु. ४०००-६००० अशी वेतनश्रेणी मुंबई

प्रांतिक महानगरपालिका अधिनियम १९४९ च्या कलम ६७ (३) चा संदर्भ घेवून महानगरपालिकेच्या स्वत:च्या स्तरावर मंजूर केली आहे. तसेच या अधिकारी/कर्मचारी यांना मागील थकबाकी देखील पूर्वलक्षी प्रभावाने अदा केली आहे. शासनाने वेतनश्रेण्या सुधारीत करणे, महानगरपालिका आस्थापनेवर नवीन पदांची निर्मिती करणे, अशा अशयाच्या मान्यता देतांना ३५ टक्केपेक्षा कमी आस्थापना खर्च आवश्यक असल्याची अट विहित केली आहे. सदर वेतनश्रेण्या सुधारीत करतांना या महानगरपालिकेचा आस्थापना खर्च ३५ टक्केपेक्षा अधिक आहे, याबाबीकडे तत्कालीन प्रभारी आयुक्तांनी दुर्लक्ष केल्याचे देखील प्रसंगत: निर्दशनास आले आहे.

शासनाने २२ महानगरपालिकांचा आकृतीबंध दि. ४.५.२००६ रोजीच्या शासन निर्णयान्वये निश्चित केला आहे. त्यामध्ये ३८ संवर्गातील पदांचा समावेश असून, त्यामध्ये करनिर्धारक व संकलक, नगर अभियंता, मेकॅनिकल इंजिनियर, जलनि:सारण अभियंता या पदांच्या वेतनश्रेण्यांचा देखील समावेश आहे. सदर आकृतीबंध हा दिशादर्शक व वेतनश्रेणी व पदनामात सुसुत्रता आणण्यासाठी आहे. त्यानुषंगाने वेतनश्रेण्या सुधारीत करतांना वेळोवेळी अधिनियमातील तरतुदीनुसार शासनाची मान्यता घेणे आवश्यक आहे. दि. ४.५.२००६ च्या सदर शासन निर्णयाप्रमाणे या ३८ पदांच्या वेतनश्रेण्या सुधारित करण्याबाबत नमूद केले असले तरी आयुक्तांनी त्याप्रमाणे वेतनश्रेण्या मंजूर करण्यापूर्वी या वेतनश्रेण्या मंजूर करण्यासंदर्भात महासभेचा ठराव प्राप्त करुन घेवून, मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम १९४९ च्या अधिनियमातील कलम-५१ मधील तरतूदीनुसार शासनाची मान्यता घेणे आवश्यक आहे. आयुक्तांनी वेतनश्रेण्या लागू करणे, पदनिर्मिती करणे अशा विषयानुंषगिक प्रस्ताव महासभेपूढे आणणे, महासभेची मान्यता मिळाल्यानंतर शासनाकडे मान्यतेसाठी पाठविणे, तद्नंतर शासन मान्यता प्राप्त झाल्यावर ते प्रत्यक्षात कर्मचा-यांना लागू करणे, असे अधिकार कलम ६७ नुसार आयुक्तांना आहेत असे दिसून येते.

मात्र प्रस्तुत प्रकरणी तत्कालीन प्रभारी आयुक्तांनी त्यांचे पूर्वीच्या आयुक्तांनी विषयाधीन प्रस्ताव शासनास मान्यतेसाठी सादर करण्याच्या विषयपत्र महासभेपुढे ठेवण्यास अनुमती दिली होती. त्यानुषंगाने महासभेने प्रस्तुत प्रकरणी आयुक्त स्तरावर कलम ६७ खाली वेतनश्रेण्या लागू करण्याचा ठराव पारित केला आहे. आयुक्तांनी या ठरावानुसार शासनाची मान्यता न घेता १० संवर्गातील वेतनश्रेण्या सुधारित करुन मोठ्या प्रमाणावर थकबाकी अदा करतांना अधिनियमातील कलम ५१ च्या तरतूदीकडे डोळेझाक करुन महापालिका निधी खर्च केल्याचे दिसून आल्याने अधिनियमातील तरतूदीशी विसंगत असलेला महासभा ठराव क्र. १२ दि. १९.४.२००६ व त्यानुषंगाने वेतनश्रेणी सुधारीत करण्याचे आदेश शासनाने समक्रमाकांचे दि. १५ नोव्हेंबर, २००७ च्या शासन निर्णयान्वये मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम १९४९ च्या कलम ४५१ (१) अन्वये निलंबित केले आहेत. सदर ठरावाच्या निलंबनाबाबत आयुक्तांनी कलम ४५१ (२) नुसार संदर्भाधीन क्र. ७ येथील पत्रान्वये महासभेचे अभिवेदन शासनास सादर केले आहे. तसेच मा. उच्च न्यायालयाच्या आदेशानुषंगाने प्रस्तुत प्रकरणी संबधित अधिकारी/कर्मचारी यांना दि. ४ मे, २०१० रोजी सचिव (नगर विकास विभाग) यांच्या दालनात मत मांडण्याची संधी दिली आहे. त्यावेळी त्यांनी मांडलेले लेखी व तोंडी मत देखील विचारात घेण्यात

आले आहे. तथापी विषयाधीन प्रकरणी वेतनश्रेण्या लागू करत असतांना महानगरपालिकेने पारित केलेला ठराव क्र. १२ दि. १९.४.२००६ हा मुळ अधिनियमातील तरतूदीशी विसंगत व अधिकारबाह्य असल्याने व अशा स्वरुपाचा अनिष्ठ पायंडा पडण्याची, तसेच अशाच प्रकारे कार्यवाही करुन नगरपालिका निधीचा दुरुपयोग करण्याची शक्यता, आणि याप्रकरणी प्राप्त अभिवेदने विचारात घेवून सदर विषयाधीन ठराव व त्यानुषंगिक आदेश विखंडीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आयुक्त,सांगली मिरज आणि कुपवाड शहर महानगरपालिका यांनी, मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, १९४९ चे कलम ५१(४) आणि कलम- ५१ चे स्पष्टीकरण विचारात न घेता कलम ६७(३) (ब) अन्वये, १० विविध संवर्गातील अधिकारी व कर्मचारी यांना महानगरपालिका ठराव क्र. १२ दि. १९.४.२००६ ला अनुसरुन शासनाची मान्यता न घेता, व अधिनियमातील तरतूदीचे पालन न करता, परस्पर सुधारीत वेतनश्रेण्या लागू करुन मोठ्या प्रमाणावर वेतनाची थकबाकी अदा केली आहे. सदर कृती अधिनियमातील कलम ५१ च्या तरतूदींशी विसंगत व अधिकारबाह्य असून महानगरपालिका निधीचा गैरवापर करणारी आहे. सबब या प्रकरणी शासनास प्राप्त सर्व अभिवेदने विचारात घेवून, समक्रमाकांच्या दि. १५ नोव्हेंबर, २००७ च्या शासन निर्णयान्वये मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम १९४९ च्या कलम ४५१ (१) अन्वये निलंबित केलेला महासभा ठराव क्र. १२ दि. १९.४.२००६ व त्यानुषंगिक आदेश मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, १९४९ चे कलम- ४५१ अन्वये प्राप्त अधिकारात या आदेशाद्वारे विखंडीत करण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

[ सुनील कोटेकर ]
कार्यासन अधिकारी महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा.मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई - ४०० ०३२
२) मा.सचिव ( नवि-२) यांचे स्वीय सहाय्यक, नगर विकास विभाग,मंत्रालय,मुंबई-४०००३२
३) आयुक्त, सांगली मिरज आणि कुपवाड शहर महानगरपालिका,सांगली
४) नगर सचिव,सांगली मिरज आणि कुपवाड शहर महानगरपालिका,सांगली
५) कक्ष अधिकारी, संगणक शाखा, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
६) सर्व संबंधित कर्मचारी/अधिकारी (आयुक्तामार्फत)
६) निवडनस्ती (नवि-२२)

**महाराष्ट्र शासन**

क्र.सामपा- ३००५/३७५७/प्र.क्र.१७५ /नवि-२२
नगर विकास विभाग
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : १४ जून, २०१०

प्रति,
आयुक्त,
सांगली मिरज आणि कुपवाड शहर महानगरपालिका
सांगली

**विषय-** सांगली मिरज आणि कुपवाड शहर महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील १० संवर्गातील अधिका-यांना शासनाच्या मान्यतेशिवाय सुधारीत वेतनश्रेण्या मंजूरीबाबत..

**संदर्भ :-** १) आपले पत्र क्र.मनपा/पशावी/०१/१७४/०६-०७ दिनांक ८.९.२००६
२) आपले पत्र क्र.आस्थावि/२/४९/०६-०७ दि. १२.१.२००७.
३) आपले पत्र क्र.आस्थावि/२/४८८/०६-०७ दि. १७.३.२००७
४) या विभागाचा समक्रमांक दि. १५ नोव्हेंबर, २००७ रोजीचा शासन निर्णय
५) आपले पत्र क्र.आस्थावि/२/९५/२००७-२००८ दि. २८.११.२००७
६) आपले पत्र क्र.मनपा /आस्थावि/०१/१५३/२००७-०८ दि. २४.०१.२००८
७) आपले पत्र क्र.मनपा /आस्थावि/०१/२००/२००८-०९ दि. ८.०७.२००८.
८) याचिका क्र. १४५०/२०१० मधील मा. उच्च न्यायालयाचे दि १९ मार्च, २०१० रोजीचे आदेश.
९) या विभागाचा समक्रमांकाचा दि १४ जून, २०१० रोजीचा शासन निर्णय

महोदय,

उपरोक्त विषयाबाबतची संदर्भाधीन पत्रे कृपया पहावीत.

०२. प्रस्तुत प्रकरणी आपणांस कळविण्यात येते की, महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील विविध संवर्गातील पदांच्या बाबतीत मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम १९४९ च्या कलम ५१(४) व कलम ५१ चे स्पष्टीकरण यातील तरतूदीशी सुसंगत कार्यपध्दती अनुसरुन सुधारीत वेतनश्रेणी लागू करणे आवश्यक आहे. त्यासाठी प्रथम उक्त अधिनियमातील तरतूदीशी सुसंगत असा महासभा ठराव घेवून आपल्या महानगरपालिकेचा मागील ३ वर्षाच्या आस्थापना खर्चाच्या टक्केवारीचा तपशिल, सदर आस्थापना खर्च विहित केलेल्या ३५ टक्के मर्यादेपेक्षा अधिक असल्यास

महानगरपालिकेचे उत्पन्नाचे स्त्रोत वाढविण्यासाठी करण्यात येणारे प्रयत्न, ज्या पदांच्या वेतनश्रेण्या शासनाप्रमाणे सुधारीत करणे आवश्यक आहे, त्या पदांच्या अन्य समकक्ष महानगरपालिका व शासनाकडील वेतनश्रेण्या यांचा तुलनात्मक तपशिल, यासंदर्भातील माहिती आणि ठरावाच्या प्रतीसह विषयाधीन विविध संवर्गाच्या वेतनश्रेण्या सुधारीत करण्याचा प्रस्ताव शासनाच्या मान्यतेसाठी सादर करावा.

आपला,

(सुनिल कोठेकर)
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) कक्ष अधिकारी, संगणक शाखा, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

२) निवडनस्ती (नवि-२२)